**मौजे पंढरपूर, जि. सोलापूर येथे सर्व सुविधांयुक्त १००० खाटांचे सामान्य रुग्णालय स्थापन करण्यास "विशेष बाब" म्हणून मान्यता देण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०२४/प्र.क्र.२९९/आ-३ अ

१० वा मजला, संकुल इमारत
गो.ते.रुग्णालय आवार, मुंबई-४००००१
दिनांक :- ०८ ऑगस्ट, २०२४

वाचा:- **सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर) मुंबई यांचे पत्र जा.क. आसेआ/कक्ष-३/टे-७/मौजे पंढरपूर सोलापूर १००० खाटांचे रुग्णालय पुणे मं/जा.क्र.१५०४३-४४/२४, दि. ०५.०८.२०२४.**

**प्रस्तावना :-**

मौजे पंढरपूर हे राज्यातील प्रसिद्ध तीर्थक्षेत्र असून हे शहर पुणे-फ़लटण-पंढरपूर राष्ट्रीय महामार्ग क्र.९६५ वर वसलेले आहे. त्यामुळे तेथे मोठ्या प्रमाणात भाविकांची वर्दळ असते. सध्याच्या १०० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयावर आषाढी, कार्तिकी, चैत्र व माघ वारीमध्ये रुग्णसेवेवर मोठ्या प्रमाणात ताण येत असतो. आयुक्तालयाने वाचा क्र.१ येथील पत्रान्वये मौजे पंढरपूर, जि. सोलापूर येथे १००० खाटांचे सर्व सुविधांनी युक्त नवनिर्मित सामान्य रुग्णालयामध्ये विशेष बाब म्हणून श्रेणीवर्धन करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

**शासन निर्णय :-**

मौजे पंढरपूर, जि. सोलापूर येथे सर्व सुविधांयुक्त नवनिर्मित १००० खाटांचे सामान्य रुग्णालय " विशेष बाब" म्हणून स्थापन करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. मौजे पंढरपूर येथे सर्व सुविधांयुक्त नवनिर्मित १००० खाटांच्या सामान्य रुग्णालयाचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र | रुग्णालयाचा तपशिल | खाटांची संख्या |
|---|---|---|
| १ | सामान्य रुग्णालय | ३०० खाटा |
| २ | महिला व शिशु रुग्णालय | ३०० खाटा |
| ३ | आर्थेपेडीक व ट्रामा केअर रुग्णालय | १५० खाटा |
| ४ | सर्जरी रुग्णालय | १०० खाटा |
| ५ | मेडीसीन अतिदक्षता रुग्णालय | १०० खाटा |
| ६ | मनोरुग्णालय | ५० खाटा |
| | **एकुण खाटांची संख्या** | **१००० खाटा** |

३. सदर नवनिर्मित १००० खाटांच्या सामान्य रुग्णालयासाठी विहीत पध्दतीने जागा उपलब्ध करुन तेथे बांधकाम व पदनिर्मिती करणे याबाबत स्वतंत्रपणे कार्यवाही करण्यात येईल.

४. शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५.०९.२०१९ मधील तरतूदीनुसार तसेच केंद्र शासनाकडून निर्गमित IPHS च्या सन २०२२ च्या मार्गदर्शक सुचनांनुसार तयार करुन एकत्रित अंदाजपत्रक व आराखडे सादर करण्यात यावेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०८१७१९५५५७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ARVIND BHIMRAO MORE

Digitally signed by ARVIND BHIMRAO MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=203af2dfba7db2a4824298a34f2c9294f93396f53d7f87cd4d69fecf5cf7005f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9246B8CCD2E2CB10707678D45EA1AD26CC1E4D7BFF7BD2AA1F253A716B8C448B, cn=ARVIND BHIMRAO MORE
Date: 2024.08.08 17:41:58 +05'30'

**(अ. भि. मोरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा. मंत्री (सार्वजानिक आरोग्य व कुटुंब कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई नागपूर.
४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
५. जिल्हाधिकारी, सोलापूर.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सोलापूर.
७. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
८. सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर) मुंबई.
९. उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे.
१०.जिल्हा शल्य चिकित्सक, सोलापूर.
११.जिल्हा आरोग्य अधिकारी, सोलापूर.
१२.जिल्हा कोषागार अधिकारी,सोलापूर.
१३. वैद्यकीय अधिक्षक, उपजिल्हा रुग्णालय, पंढरपूर, जि. सोलापूर.
१४.नियोजन विभाग, (का.१४७२) मंत्रालय, मुंबई.
१५.वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१६.कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/ सेवा-५/अर्थसंकल्प, सा.आ.वि. मंत्रालय, मुंबई.
१७.निवडनस्ती (आरोग्य ३-अ)